# स्वगत : ज्याममज्या मन्याजोशी

- सलील वाघ

गेल्या सहाएक महिन्यांत हेमंत दिवटेच्या 'अभिधानंतर'नी एकमागोमाग एक अशा दमदार कवितांच्या पुस्तकांचा एक गड्ड्याझब्बूच मराठी साहित्यविश्वाला दिलेला आहे. त्यातलाच एक ताजा धमाका म्हणजे मन्या जोशीचा ज्याम मज्या हा संग्रह. वर्जेश सोलंकी ह्या अभिधानंतरच्या पहिल्या कवीने सुरू केलेली, कवी आणि कवितेबाबतच्या अपेक्षा उंचावण्याची परंपरा निर्विवादपणे पुढे नेणारा हा संग्रह आहे. इंग्रजीत ज्याला पॅलिनड्रोम (Palindrome) म्हणतात, म्हणजे - तो कवी डालडा विकतो, रामाला भाला मारा, ती होडी जाडी होती वगैरेसारख्या द्विदिश वाक्यापासूनच- 'ज्याम मज्या' ह्या शीर्षकापासूनच ह्या संग्रहाची मजा सुरू होते. दिल्ली किंवा कलकत्तावगैरे ठिकाणी प्रेक्षणीय स्थळेबिळे बघायला गेल्यावर तिथे तांदळाच्या दाण्यावर बारीक बारीक अक्षरांत नाव वगैरे लिहून देणारे कारीगर आढळतात. मनोजच्या कविता वाचतानाही आपल्याला असेच तांदळावरचे कोरीव नक्षीकाम पाहिल्याचा आनंद मिळतो. मनोज हा अरूण कोलटकरांच्या तोडीचा कुशल भाषागीर आहे. तो स्वत: एक ओरिजनल कवी असला तरी त्याच्या कवितेतून कोलटकर आणि सारंग दोघेही इतके ऐकू येतात की 'ज्याम मज्या' हा संग्रह 'अभिधा'ने न काढता अशोक शहाणेंनी 'प्रास'तर्फे *'अरूण कोलटकरच्या काही अप्रकाशित कविता'* अशा नावाने काढला असता तरी वरवर वाचणाऱ्या कुणाला संशयही आला नसता की हा मनोजचा संग्रह आहे की अरूणचा ? कोलटकर-सारंगाशी इतकी शैलीशास्त्रीय जवळीक असल्यावर कुणालाही मनोज हा अनुकरणात अडकलेला कवी आहे की काय असा सहजच संशय येईल. त्या संशयाला छेद देणारी गुणवत्ता मनोजकडे असल्याने तो ह्या पर्जन्यछायेच्या पलिकडच्या गावात पोचू शकतो. नवनियतकालिकांच्या पिढीत, समाजाच्या नीतीमत्तेबद्दल बोलणाऱ्या श्रीधर तिळवेप्रमाणे मनोजही समाजाच्या नैतिक अवकाशातच उमटतो. मनोज हा नैतिकतेबद्दल बोलत बोलत अत्यंत आखीव अवकाशाच्या सीमारेषेत भाषा कोरतो. त्याच्या त्याच्या संदर्भविश्वाचं एक छोटसं टुमदार गाव आहे. त्या गावातून तो आपल्याला एक राईड मारून आणतो. कुशल वैमानिकाप्रमाणे किंवा चालकाप्रमाणे दोन्ही हात सोडून भाषेची गाडी चालवणे, एका चाकावर गाडी फिरवणे, शार्प यू टर्न घेणे, गाडी गोल गोल फिरवणे, उडवणे, आगीतून जंप मारणे, पाण्यातून नेणे, चालत्या गाडीवर झोपणे वगैरे चित्तथरारक कवायती आणि श्वास रोखायला लावणाऱ्या कसरती तो करतो. श्रीधर तिळवे किंवा मंगेश काळे हे जसे भाषेतले कुस्तीगीर आहेत तसा मनोज हा भाषेचा कसरतपटू आहे. कसतरपटू हा थोडासा अवमूल्यन झालेला शब्द आहे, पण भाषेचं कौशल्य अंगी असणं आणि समजूनउमजून अक्कलहुशारीने राजीखुशीने भाषा वापरणं हा आजकालच्या मराठीत अत्यंत दुर्मिळ होत चाललेला गुण मनोजच्याकडे असल्याने त्याच्या भाषिक प्रभूत्वाच्या प्रयोगाला चांगल्या अर्थाने कसरत शब्द वापरायला काहीच हरकत नाही. ती साधीसुधी कसरत नसून तारेवरची कसरत आहे. इतक्या सात्विकपणे आणि सोज्वळपणे भाषा वळवणारा कोणीही कवी आज आपल्या पिढीत नाही. त्याच्या सोज्वळतेने त्याच्याच पिढीतल्या मनोज सुरेंद्र पाठकच्या कवितेची आश्चर्यकारकरित्या आठवण येते. प्रमाणभाषेत आक्षेपार्ह ठरतील असे अनेक शब्द त्याच्या कवितेत अलगद येतात. उदाहरणार्थ, गांड हा शब्द एकंदर पुस्तकात १२ ते १५ वेळा आलेला आहे. पण मनोज ज्या पद्धतीने त्याचं पोझिशनिंग करतो त्यामुळं तो गैर न वाटता त्याला एक गोडवा येतो. त्याच्या भाषेत एक प्रकारचा प्रसन्न कैफ आणि मार्दव आहे. कित्येक गोष्टी बोलण्या-न बोलण्याच्या सीमारेषेवर तो सोडून येतो. शब्दांची चणचण त्याला जाणवते आणि भाषेची महागाई तो जाणतो त्यामुळं तो भाषा वाया घालवत नाही किंवा हिंदकळून सांडू देत नाही. अभ्यासक्रम आणि जीवन यांच्यातल्या पेचस्थानी त्याच्या कवितांचं केंद्र आहे. अभ्यासक्रमातल्या धारणा आणि समक्ष जीवनातल्या धारणा यांच्यातल्या विपरित नात्यांकडे तो कटाक्ष टाकतो. तो समाजाच्या धारणांबद्दल बोलतो मूल्यांबद्दल नाही. तो मूल्यांपर्यंत पोचत नाही. त्याने धारणांवरच आपला झोत केंद्रित केलेला आहे. अनेक मोह टाळणारी आणि विस्ताराचं बंधन न मानणारी, जागोजागी जागी राहणारी आणि पदोपदी विस्तार आखडता घेणारी त्याची कविता आहे. मनोज कवितेतल्या कवितेत अनेक डेडएंड पाळतो आणि आपल्यालाही दाखवतो. तरीही त्या डेडऐंडमुळं त्याची लय खुंटत नाही, कविता संपत नाही किंवा भाषेच्या प्रवाहात व्यत्यय येत नाही. त्याची कविता ही भाषेच्या कॅरिकेचर्सची एक मालिका आहे. हेमंत दिवटे, वर्जेश सोळंकी, संजीव खांडेकर यांच्याप्रमाणे तो कॉस्मोमराठी भाषेत बोलतो. त्याच्यापाशी भाषेचा तल्लखपणा आहे. तो असाधारण आहे. आशयद्रव्याचं कवितेत कन्व्हर्जन करण्यासाठी लागणारी उचित समजही त्याच्याकडे आहे. धारणांकडून मूल्यांकडे सरकण्याची जोखीम जर त्याने पत्कारली तर त्याच्या कवितेला कुठलाच धोका नाही. अन्यथा साठोत्तरीवाल्यांप्रमाणे त्याची कविता अल्पजीवी आणि आतून पोकळ व्हायची भीती आहे.